GR 200408131634507001 - 1700

**बृहन्मुंबईतील पदपथावर वसलेल्या झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन करण्याच्या दृष्टीने शिफारशी करण्यासाठी समिती.**

**महाराष्ट्र शासन,**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्र. बैठक १००१/प्र.क्र.१२५/झोपसु-१**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक :- 3.10-2001**

**प्रस्तावना :**

बृहन्मुंबईतील विविध ठिकाणच्या पदपथावर सुमारे २१,००० झोपडया वसलेल्या आहेत. प्रमुख रस्त्याच्या पदपथावरील या झोपडपट्टयांमुळे वाहतुकीला अडथळा येतोच. शिवाय घाण, कचरा, प्रदुषण याचेही दुष्परीणाम सर्वांना भोगावे लागतात. काही ठिकाणी विकास कामांनाही पदपथावरील झोपडपट्टीवासियांमुळे अडथळा निर्माण झालेला आहे. म्हणूनच पदपथ मोकळे करणे आवश्यक आहे आणि पदपथावरील झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन केल्याशिवाय पदपथ मोकळे होणे शक्य नाही. म्हणून या बाबीवर सर्वंकष चर्चा करण्यासाठी मा. राज्यमंत्री ( गृहनिर्माण ) यांनी दिनांक ४ एप्रिल, २००१ रोजी एक बैठकीचे आयोजन केले होते. या बैठीमध्ये पदपथ मोकळे करण्याच्या दृष्टीने पदपथावरील पात्र झोपडपट्टीवासियांसाठी पुनर्वसन योजना कोणत्या प्रकारे राबवावी, त्यासाठी आर्थिक तरतुद, पुनर्वसनामध्ये येणा-या कायदेशीर अडचणी इत्यादी बाबींचा सर्वंकष अभ्यास करुन शासनाला शिफारशी करण्यासाठी एका समितीचे गठन करण्याचे ठरविण्यात आले. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

बृहन्मुंबईतील पदपथावरील झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन करुन, महानगरातील वाहतुकीवर तसेच लोकांच्या आरोग्यावर होणारे दुष्परिणाम टाळण्याच्या दृष्टीने पदपथावरील पात्र झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन कोठे आणि कशा प्रकारे करावयाचे या बाबींचा सर्वंकष अभ्यास करुन शासनाला शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) | श्री. रविभूषण बुध्दिराजा, प्रधान सचिव (गृहनिर्माण) | अध्यक्ष |
| २) | श्री. गौतम चटर्जी, अति.महानगरपालिका आयुक्त | सदस्य |
| ३) | श्री. उत्तम खोब्रागडे, उपाध्यक्ष व मु. का. अ.प्राधिकरण | सदस्य |
| ४) | श्री. विजय माथनकर, मु. का. अ. झो. पु. प्रा. | सदस्य |
| ५) | श्री. यु. पी. एस. मदान, प्रकल्प संचालक, एमयुटीपी | सदस्य |
| ६) | श्री. जोकीन, स्पार्कचे प्रतिनिधी | सदस्य |
| ७) | श्री. लोखंडे - मुख्य अधिकारी, झो. सु. मं. मुंबई | सदस्य सचिव |

या समितीकडे सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविलेले विचारार्थ विषय शासनाला उपाय योजना सुचविण्यासाठी सोपविले आहेत.

समितीने आपला अहवाल या शासन निर्णयाच्या तारखेपासून २ महिन्यांच्या मुदतीत शासनाला सादर करावा.

सदर समितीच्या सदस्य-सचिवांनी अभ्यासगटाच्या बैठका केव्हा व कोठे घ्याव्यात याबाबत अभ्यासगटाच्या अध्यक्षांची पूर्वानुमती घेवून त्याप्रमाणे बैठकीचे आयोजन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

7/10/2009

(ल.दा.व्यास)
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे अवर सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.महसूल मंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री, विधी व न्याय विभाग यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे अवर सचिव,
अभ्यासगटाचे मा.अध्यक्ष,
अभ्यासगटाचे सर्व सन्माननीय सदस्य,
आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका,
उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा,
मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.

## परिशिष्ट.

शासन निर्णय,गृहनिर्माण विभाग, क्र.बैठक.१००१/प्र.क्र.१२५/झोपसू.१ चे परिशिष्ट.

## समितीला नेमून दिलेले विचारार्थ विषय.

(१) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील झोपडपट्टीवासियांनी व्यापलेले एकूण पदपथ.

(२) पदपथावरील झोपडपट्टीवासियांची संख्या, दि.१.१.१९९५ पूर्वी पासून अस्तित्वात असलेल्या पदपथावरील झोपडया.

(३) तातडीने पदपथावरील निष्कासित करावयाच्या झोपडपट्टया.

(४) पदपथावरील झोपडीवासियांचे स्थलांतर अन्यत्र कोणत्या प्रकारे करावे याबाबत शिफारशी.

(५) पदपथावरील झोपडपट्टीवासियांच्या पुनर्वसनासाठी लागणारी एकूण जमीन व जमीन कोणत्या प्रकारे उपलब्ध करावी याबाबत शिफारशी.

(६) पदपथावरील झोपडपट्टीवासियांच्या पुनर्वसनासाठी योजना कशाप्रकारे राबवावी.

(७) जमिनीची किंमत,पुनर्वसनाचा खर्च,बांधकाम इत्यादी बाबींसाठी आर्थिक तरतूद कशाप्रकारे करावी याबाबतच्या शिफारशी.

(८) संबंधित कायदे,कायद्यातील सध्याच्या तरतूदी व कोणत्या प्रकारच्या कायदेशीर तरतूदी करणे आवश्यक आहे याबाबतच्या शिफारशी.

(९) पदपथावरील झोपडपट्टी